विषय:- मुंबई विक्रीकर अधिनियमाच्या नियम ४१ फ अंतर्गत वजावटीची (SET-OFF) तरतूदीसाठी प्रशासकीय सवलत.

---

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक-विकअ-११.०३/प्रक्र.११७/कराधान-१
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक:- १० ऑगस्ट २००४.

**वाचा:** अधिसूचना क्र.विकनि-१२.०३/प्रक्र.११७/कराधान-१, दिनांक २७.३.०४.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र शासनाने उपरोक्त अधिसूचनेअन्वये मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या नियम ४१ फ मध्ये पूर्वलक्षी प्रभावाने (१.५.२००० पासून ) सुधारणा केली आहे. उत्पादन करण्यात आलेल्या वस्तूपैकी एखाद्या वस्तूवर जर कलम ४१ खाली पूर्ण करमाफी दिली असेल तर कच्च्या मालावरील कराची वजावट पूर्ण न मिळता यथास्थिती अंशत: मिळेल असे सुधारणेचे स्वरुप आहे. सरकीपासून तेल काढताना जी सरकीची पेंड मिळते तिच्यावर कलम ४१ अन्वये पूर्ण करमाफी आहे. त्यामुळे अशा उत्पादकांना देखील ही सुधारणा पूर्वलक्षी प्रभावाने लागू झाली.

परंतु काही प्रकरणात २०००-०१, २००१-०२ या कालावधीची निर्धारणा पूर्ण झालेली असून त्यामध्ये पूर्ण वजावट मिळालेली आहे. तसेच त्यांनी पुढील खरेदी व्यवहार देखील अशी पूर्ण वजावट मिळणार या समजुतीनेच केलेले आहेत. परंतु त्यांना या नवीन पूर्वलक्षी तरतूदीनुसार मागील कालावधीसाठी कर भरावा लागणार आहे. त्यामुळे त्यांचे व्यवसाय आर्थिक अडचणीत आले आहेत. व्यापा-यांची अडचण लक्षात घेऊन शासन खालीलप्रमाणे प्रशासकीय सवलत मंजूर करीत आहे :-

**शासन निर्णय :**

१ मे २००० ते २९ फेब्रुवारी २००४ पर्यन्तच्या कालावधीसाठी प्रशासकीय सवलत म्हणून सरकीपासून तेल व पेंड तयार करणा-या व्यापा-यांना मुंबई विक्रीकर नियम, १९५९ च्या नियम ४१ फ मध्ये दिनांक २७ मार्च २००४ ची सुधारणा झाली नसती तर उपरोक्त कालावधीसाठी जितकी वजावट मिळाली असती तितकी वजावट देण्यात यावी. यासाठी मात्र सदर वजावटीमुळे जर परतावा मिळणार असेल तर अशा परताव्यावर व्याज

दिले जाणार नाही. मात्र ही प्रशासकीय सवलत दिनांक २९ फेब्रुवारी २००४ पर्यन्त संपणा-या कालावधीसाठीच लागू राहील. तसेच दिनांक २७ मार्च २००४ च्या अधिसूचनेतील तरतूद उपरोक्त प्रकारच्या उत्पादनासाठी दिनांक १ मार्च २००४ पासून लागू होईल.

**प्रशासकीय सहाय्य मंजूर करणारी यंत्रणा :-**

या शासन निर्णयानुसार प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देण्यात येत असून आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपआयुक्त, सहाय्यक विक्रीकर आयुक्त (प्रशासन) अथवा त्या दर्जाखालील इतर संबंधित अधिका-यांना हे अधिकार प्रदान करण्याची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु.ना.जामोदे)
शासनाचे उप सचिव

प्रत :

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०००१०.
२. महालेखापाल (एस टी आर अे), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (एस टी आर अे), महाराष्ट्र-२, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवड नस्ती, कराधान-१.